जलसंधारणाचा कार्यक्रम अधिक व्यापक होण्यासाठी पाणलोट विकास चळवळ कार्यक्रमाची अंमलबजावणी करणेबाबत.
सन २००९-१०

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
शासन निर्णय, क्र.पाविच-२००९/प्र.क्र.५३/जल-८
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : **१५ मार्च, २०१०.-**

**संदर्भ :-** शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग

1. क्र.जलसं-२००२/प्र.क्र.५८१/जल-७, २८ फेब्रुवारी,२००२
2. क्र.जलसं २००८/प्र.क्र.३१/जल-८, दि.२५ ऑगस्ट, २००८.
3. क्र.जलसं २००८/प्र.क्र.५५/जल-८, दि.२७ ऑक्टोबर,२००८.
4. क्र.जलसं-२००९/प्र.क्र.३४/जल-८, दिनांक १ जुलै, २००९
5. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. मृदसं/ पाणवळ/प्रस्ताव/ ०९-१०/मृद-१/२६३४/०९, दि.२२ ऑक्टोबर २००९.
6. मृदसं/पाणवळ/प्रस्ताव/०९-१०/मृद-१/२९०८/०९, दि.२१ नोव्हेंबर, २००९.
7. शासन निर्णय क्र. पाविच-२००९/प्र.क्र.५३/जल-८, दिनांक १ जानेवारी,२०१०

**<u>शासन निर्णय</u> :-**

राज्यातील बहुतांशी क्षेत्र कोरडवाहू असून उपलब्ध जलस्त्रोताचा उपयोग केला तरी देखील ६०टक्के पेक्षा जास्त क्षेत्र कायम स्वरुपी नैसर्गिकरित्या पडणा-या पावसावरच अवलंबून रहाणार आहे. हे लक्षात घेवून पाणलोट क्षेत्रविकासाचा कार्यक्रम गेल्या अनेक वर्षापासून राज्यात सुरु असून, सुरु केलेले पाणलोट मोठ्या प्रमाणावर अपूर्ण आहेत. हे पाणलोट गतीमान पध्दतीने विकसित करण्याचा धडक कार्यक्रम देखील शासनाने हाती घेतला आहे. महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी अभियान प्रामुख्याने लोकसहभागातून राज्यात गेली काही वर्षे सुरु आहे. हे सर्व प्रयत्न होत असले तरी देखील राज्यांतील पाणलोट विकासाकरीता उपलब्ध असलेल्या क्षेत्राची व्यापकता फार मोठी असल्याने, मृद व जलसंवर्धनाचे उद्दिष्ट सर्वसामान्य जनतेपर्यंत पोहोचविण्यासाठी जलसंधारणाकरीता पाणलोट विकास चळवळ कार्यक्रम राबविण्याचा निर्णय शासनाने संदर्भाधीन २ येथील दिनांक २५ ऑगस्ट २००८ चे शासन निर्णयाव्दारे घेतला.

२. जलसंधारणाचा कार्यक्रम अधिक व्यापक करणे, पाणलोट विकास कार्यक्रमाच्या प्रत्येक टप्प्यात लोकसहभाग घेणे, याकरीता विविध स्तरावर सातत्याने प्रसिध्दी देणे, पाणलोट सप्ताह आयोजित करणे

..२/-

इत्यादी माध्यमाद्वारे पाणलोट विकास चळवळ कार्यक्रम सन २००९-१० मध्ये राबविण्यास संदर्भाधीन दिनांक १ जानेवारी, २०१० च्या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात आली आहे. वरील उद्दिष्ट साध्य करण्यासाठी वृत्तपत्रे, मासिके, आकाशवाणी, दूरदर्शन, जाहिराती इत्यादी विविध माध्यमांद्वारे प्रसिध्दी करणे आणि या विषयाशी निगडीत कार्यशाळा, चर्चासत्रे आयोजित करणे, विविध पाणलोट विषयीच्या स्पर्धा आयोजित करणे, शैक्षणिक उपक्रमांद्वारे प्रचार व प्रसिध्दी करणे, प्रक्षेत्र भेटी, यशोगाथा प्रसिध्दी इत्यादी सर्व माध्यमांद्वारे पाणलोट विकास चळवळ राबविण्यास व त्याकरिता रु. १.०० कोटी खर्च करण्यास संदर्भाधीन दिनांक १ जानेवारी, २०१० अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

३. महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी अभियान राज्यात सन २००९-१० मध्ये सुरु ठेवण्यास संदर्भाधीन दिनांक १ जुलै, २००९ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी अभियान प्रामुख्याने लोकप्रतिनिधींचा सहभाग व लोक चळवळीद्वारे राबविण्याचे अपेक्षित आहे. या संदर्भात शासन निर्णय दिनांक २८ फेब्रुवारी,२००२ अन्वये विविध समित्या गठीत केल्या असून जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या समितीने कृती आराखडा तयार करुन विविध प्रशासकीय यंत्रणेमार्फत अंमलबजावणी करावयाची आहे.

४. जलसंधारणाचा कार्यक्रम व्यापक होण्यासाठी पाणलोट विकास चळवळ कार्यक्रमाची अंमलबजावणी अधिक गतिमान व लोकाभिमुख करणे यासाठी महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी अभियानाची सांगड या कार्यक्रमाशी घातल्यास अधिक परिणामकारक होऊ शकेल, असे दिसून आले आहे. हे लक्षात घेऊन मृद व जलसंवर्धनाचे उद्दिष्ट सर्वसामान्य जनतेसमोर पोहोचविण्यासाठी लोकजागृती निर्माण करणे, तालुका व जिल्हास्तरावर अधिक प्रसिध्दी देणे तसेच लोकसहभागातून मृद व जलसंधारणाची जास्तीत जास्त कामे घेण्याकरिता प्रोत्साहन देणे इत्यादीसाठी प्रत्येक जिल्ह्याला **रु.३.०० लाख (रुपये तीन लाख फक्त)** इतका निधी उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. राज्यातील एकूण ३३ जिल्ह्यांसाठी **रु.९९.००लाख (रुपये नव्याण्णव लाख फक्त)** निधी मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच पाणलोट विकास चळवळीच्या कार्यक्रमाचे समन्वय व संनियंत्रण याकरिता **रु.१.०० लाख (रुपये एक लाख फक्त)** इतका निधी आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे. अशाप्रकारे एकूण **रु.१.०० कोटी (रुपये एक कोटी फक्त)** निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. या शासन निर्णयाव्दारे पाणलोट विकास चळवळ कार्यक्रमांतर्गत सन २००९-१० मध्ये खालील लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या तरतूदीपैकी उर्वरित रु.**१००.०० लाख (रुपये शंभर लाख फक्त)** तरतूद वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**सदरहु खर्च लेखाशिर्ष,**
**"मागणी क्रमांक एल-७, ४४०२- मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च -**
**१०२ (दोन) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना**
**१०२ (०१) (०१) पाणलोट विकास चळवळ, प्रसिध्दी व पारितोषिक योजना**
**(४४०२ २३५१) ५, बक्षिसे**
**२६, जाहिरात व प्रसिध्दी "**

६. हा निधी खर्च करण्यास आयुक्त (कृषि) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून या निधीचे जिल्हाधिकारी यांना वितरण करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी यांना वितरीत केलेला निधी उपरोक्त परि.४ मध्ये दर्शविलेल्या उद्दिष्टाकरीता खर्च होईल याची जिल्हाधिकारी यांनी दक्षता घ्यावी. तसेच या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी केलेल्या कार्यवाहीचा अहवाल आयुक्त(कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे तसेच सर्व जिल्हाधिकारी यांनी स्वतंत्रपणे शासनास सादर करावा.

७. पाणलोट विकास चळवळ कार्यक्रमाकरिता संदर्भाधीन दिनांक १ जानेवारी, २०१० अन्वये वितरीत केलेला **रु.१.०० कोटी (रुपये एक कोटी फक्त)** व आता या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला **रु.१.०० कोटी (रुपये एक कोटी फक्त)** असा एकूण **रु.२.०० कोटी (रुपये दोन कोटी फक्त)** वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००३१५१८११४१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( रेखा भिडे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,

मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मंत्री (जलसंधारण), यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री, (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
सर्व मा.मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,
प्रमुख मार्गदर्शक, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,
कार्याध्यक्ष, आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती, पुणे,
मुख्य सचिव यांचे सचिव,
सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,/महासंचालक,माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दीकरीता),
सर्व सहसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त,
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व मुख्य वनसंरक्षक,/ सर्व उपवनसंरक्षक,
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण,
सर्व उपायुक्त (विकास),
महालेखापाल-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) ( ३ प्रती )
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (३ प्रती )
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (३ प्रती )
जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व (३ प्रती )
नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
जल-८ (निवड नस्ती), ग्रा.वि.व ज.सं.विभाग, मंत्रालय, मुंबई.